महाराष्ट्र शासन

अविवि-२०१३/प्रक्र.१७८/का.०७,
अल्पसंख्याक विकास विभाग,
मादाम कामा रोड, हुतात्मा चौक
मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२
दि. २८/०७/२०१५

विषय :- **१२ व्या पंचवार्षिक योजनेत केंद्र पुरस्कृत अल्पसंख्यांक बहुल क्षेत्रासाठी बहुक्षेत्रीय विकास योजनेंतर्गत (MsDP) परळी शहर, जिल्हा बीड येथे अल्पसंख्यांक समाजातील मुलांसाठी व मुलींसाठी १०० प्रवेशक्षमतेच्या प्रत्येकी ०१ याप्रमाणे एकूण ०२ वसतीगृह बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत निर्गमित आदेशातील सुधारणाबाबत.**

संदर्भ :- १.समक्रमांकित शासन ज्ञापन, अल्पसंख्याक विकास विभाग, दिनांक २७.०३.२०१५
२.समक्रमांकित शासन ज्ञापन, अल्पसंख्याक विकास विभाग, दिनांक २७.०३.२०१५
३. समक्रमांकित शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, दिनांक ३१.०३.२०१५

**ज्ञापन:-**

संदर्भाधिन क्र. (१) व (२) येथील शासन ज्ञापनान्वये परळी शहर, जि. बीड येथील अल्पसंख्याक समाजातील मुलांसाठी व मुलीसाठी बांधण्यात यावयाच्या १०० प्रवेशक्षमतेच्या प्रत्येकी ०१ याप्रमाणे एकूण ०२ वसतीगृह बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकिय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. तसेच संदर्भाधिन क्र. (३) येथील शासन निर्णयान्वये उक्त प्रयोजनासाठी पहिल्या टप्प्यात (केंद्र व राज्य हिस्सा मिळून ) एकूण रु.३१०.०० लक्ष (अक्षरी रुपये तीन कोटी दहा लक्ष फक्त) इतकी रक्कम जिल्हाधिकारी, बीड यांना मंजूर करुन वितरित केली आहे. यासंदर्भात केंद्रशासनाने दिलेल्या मान्यतेनुसार परळी शहर, जि. बीड येथील अल्पसंख्याक समाजातील मुलांसाठी व मुलीसाठी १०० प्रवेशक्षमतेच्या प्रत्येकी ०१ याप्रमाणे एकूण ०२ वसतीगृह बांधकाम प्रकल्पांची अंमलबजावणी प्रभावीपणे व्हावी या दृष्टीने संदर्भाधिन शासन आदेशामध्ये खालीलप्रमाणे काही सुधारणा करण्यात येत आहेत :-

**१) परळी शहर, जि. बीड येथील विषयांकित एकूण ०२ वसतीगृह इमारतीचे बांधकाम करण्यासाठी नगरपरिषद परळी शहर, जि. बीड यांच्याकडून प्रस्तावित करण्यात आलेली निविदा प्रक्रिया ही वसतीगृहांच्या शासनमान्य टाईपप्लॅननुसार (क्र.THLSL-६११९) नसल्याचे आढळून येत असल्याने ती रदद करण्यात यावी,**

**२) परळी शहर, जि. बीड येथील विषयांकित एकूण ०२ वसतीगृहांचे बांधकाम, वसतीगृहांच्या शासनमान्य टाईपप्लॅननुसार (क्र.THLSL-६११९) तसेच, सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सक्षम प्राधिका-याने यासाठीच्या सविस्तर अंदाजपत्रकास दिलेल्या मान्यतेनुसार (तांत्रिक मान्यतेसह) सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत नगरपरिषद परळी शहर, जि. बीड यांच्याकडून सुनिश्चित करण्यात आलेल्या जागेवर करण्यात यावे,**

**३) शासन निर्णय, दि.३१.०३.२०१५ अन्वये परळी शहर, जि. बीड येथील विषयांकित एकूण ०२ वसतीगृह इमारतीचे बांधकाम करण्यासाठी पहिल्या टप्प्यात (केंद्र+राज्य हिस्सा मिळून) एकूण**

रु.३१०.०० लक्ष (अक्षरी रुपये तीन कोटी दहा लक्ष फक्त) इतकी रक्कम जिल्हाधिकारी, बीड यांना वितरीत करण्यात आली असून, ती त्यांच्यामार्फत मुख्याधिकारी, नगरपरिषद परळी शहर, जि. बीड यांना वर्ग करण्यात आलेली आहे. मुख्याधिकारी, नगरपरिषद परळी शहर, जि. बीड यांनी हे आदेश प्राप्त होताच ०७ दिवसांच्या आत सदर रक्कम कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अंबाजोगाई यांच्याकडे सुपूर्द करावी. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अंबाजोगाई यांनी सदर रक्कम जमा झाल्याची खात्री करुन शासनास व जिल्हाधिकारी, बीड यांना अहवाल सादर करावा. मुख्याधिकारी, नगरपरिषद परळी शहर, जि. बीड यांच्याकडून मुदतीत रक्कम कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अंबाजोगाई यांच्याकडे वर्ग झाल्याची खात्री करुन जिल्हाधिकारी, बीड यांनी त्यांचा स्वंतत्र अहवाल शासनास सादर करावा,

४) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अंबाजोगाई यांनी विषयांकित एकूण ०२ वसतीगृह इमारतीचे बांधकाम सुरु करण्यासाठी आवश्यक त्या बाबींची त्वरेने पूर्तता करुन घ्यावी आणि यासाठी शासन निकषांनुसार निविदा प्रक्रिया करुन कामास तात्काळ सुरवात करावी व तसे शासनास अवगत करावे,

५) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अंबाजोगाई यांनी विषयांकित बांधकामासाठी प्राप्त होणा-या केंद्र व राज्य हिश्यातील रकमेच्या विनियोगाबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे व त्रैमासिक प्रगती अहवाल विहीत नमुन्यात (अद्यावत छायाचित्रांसह) जिल्हाधिकारी, बीड यांच्यामार्फत शासनास वेळोवेळी सादर करावा. तसेच विभागाच्या Construction Tracker प्रणालीवर देखील वरील बांधकामांची माहीती वेळोवेळी Upload करावी.

६) परळी शहर, जि. बीड येथील विषयांकित एकूण ०२ वसतीगृहांचे व्यवस्थापन अल्पसंख्याक विकास विभागाकडून यथावकाश निर्धारीत करण्यात येईल. तदनुसार संबंधित यंत्रणेकडून विषयांकित ०२ वसतीगृहांचे व्यवस्थापन करण्यात येईल,

७) केंद्रशासनाने दिलेल्या मान्यतेनुसार विषयांकित एकूण ०२ वसतीगृह इमारतीचे बांधकाम प्रक्रिया मुदतीत पूर्ण होण्यासाठी तसेच प्रकल्पात येणा-या अडचणींचे निराकरण करण्यासाठी जिल्हाधिकारी, बीड यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे समिती गठित करण्यात यावी :-

अ) जिल्हाधिकारी, बीड
आ) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अंबाजोगाई
इ) मुख्याधिकारी, नगरपरिषद परळी शहर, जि. बीड
ई) प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, परळी , जि. बीड

३. यासंदर्भात संदर्भाधीन शासन आदेशामधील अन्य अटी व शर्ती जशाच्या तशा लागू राहतील.

४. प्रस्तुत शासन ज्ञापन, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उपविभाग पाच अ.क्र.१, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. प्रस्तुत शासन ज्ञापन, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतसथळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१५०७३०१२४५२९५५१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok Hari Gaikwad

Digitally signed by Ashok Hari Gaikwad
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ashok Hari Gaikwad
Date: 2015.07.30 12:49:18 +05'30'

**(अशोक गायकवाड)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त, औरंगाबाद,
२. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
३. सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. जिल्हाधिकारी, बीड
५. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, औरंगाबाद
६. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, उस्मानाबाद
७. कार्यकारी अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ, अंबाजोगाई.... **आपणांस विनंती आहे की, उक्त आदेशातील आपणांशी संबंधित निर्देशांवर आपणांकडून आवश्यक ती सर्व कार्यवाही प्राथम्याने करण्यात यावी.**
८. मुख्याधिकारी, परळी नगरपरिषद, बीड
९. संचालक, तंत्र शिक्षण/ व्यवसाय शिक्षण संचालनालय, मुंबई
१०. प्राचार्य, शासकिय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, परळी,
११. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा बीड
१२. वित्त विभाग (अर्थसंकल्प-४/व्यय -४) मंत्रालय, मुंबई
१३. नियोजन विभाग (कार्या.१४७५)
१४. निवड नस्ती, (का.७)